# ॥ श्रीमहासरस्वतीपञ्चकम् ॥



ब्राह्मी शक्तिसमुद्भवा कमलजा भार्या सुता वेधसः।
या धन्यं कुरुते विरिञ्चिनिलयं वीणास्वरैः पावनैः ॥
योषा हंसरथा मयूरकरथा बुद्ध्या गतिः केवला ।
ज्ञानानन्दसुधां ददातु मधुरां मह्यं मतिं शारदा ॥ १ ॥
श्रुत्वा सुस्वरगायनं निरुपमं यस्या वरं मङ्गलम् ।
मुग्धाः पारिषदास्तथैव सकला देवर्षयो ब्रह्मणः ॥
वेधा ध्यानरतस्तथैव भगवान्विष्णुस्तुरीये स्थितः ।
ज्ञानानन्दसुधां ददातु मधुरां मह्यं मतिं शारदा ॥ २ ॥
शुक्ला नीलसरस्वती भगवती शुभ्राम्बरा योगिनी ।
विद्याज्ञानकलानिधानमनघा मालाधरी केशिनी ॥
पद्माक्षी वृषिपिच्छरत्नविलसच्चूडामणिं बिभ्रती ।
ज्ञानानन्दसुधां ददातु मधुरां मह्यं मतिं शारदा ॥ ३ ॥
विप्रा यां समुपासते च विबुधा ज्ञानोत्सुकास्तापसाः ।
विद्यारम्भपरास्तथैव मुनयो विद्यार्थिनो योगिनः ॥
तेषामीहितदायिनी खलु सदा चोन्मत्तदर्पापहा ।
ज्ञानानन्दसुधां ददातु मधुरां मह्यं मतिं शारदा ॥ ४ ॥
ज्ञानं शाश्वतमुज्ज्वलं च निखिलं सृष्टं गणेशेन तु ।
ईशा वै प्रकटीकरोति सततं स्थित्वा गुरूणां मुखे ॥
यस्याः सत्कृपया जडस्तु भुवने मूढोऽपि सूरायते ।
ज्ञानानन्दसुधां ददातु मधुरां मह्यं मतिं शारदा ॥ ५ ॥
सरस्वति नमस्तुभ्यं पावनि वाङ्महेश्वरि ।
ज्ञानं देहि महादेवि प्रसन्ना वरदा भव ॥

**- डॉ . पुष्कराज उदय वर्तक, १५-११-२०१४.**

( जी ) ब्रह्मदेवाची शक्ती आहे; आदिशक्तीच्या स्वरूपापासून निर्मित कमलोद्भवा आहे ; ब्रह्मदेवाची कन्या आणि पत्नीही आहे ( सरस्वती देवी आधी ब्रह्मदे वापासून निर्माण झाली ; पण ब्रह्मदेवाने नंतर तिच्याशी विवाह केला .); पवित्र अशा वीणेच्या स्वरांनी ब्रह्मलोकास जी धन्य करते ; जी ( ग्रहणशक्ती, प्रतिभाशक्ती आणि धारणाशक्ती अशा तीन प्रकारच्या ) बुद्धीचा केवळ आधार आहे, हंस आणि मोर वाहन असलेली (चिर) तरुणी आहे ; ती शारदा मला मती आणि ज्ञानाचे मधुर अमृत प्रदान करो. ॥ १ ॥

जिचे श्रेष्ठ, सुस्वर, मंगलमय असे गायन ऐकून ब्रह्मदेवाचे दरबारी आणि देवर्षी गुंग होतात; ब्रह्मदेव ध्यानमग्न आणि भगवान विष्णू समाधीमग्न होतात ; ती शारदा मला मती आणि ज्ञानाचे मधुर अमृत प्रदान करो. ॥ २ ॥

( जी ) श्वेतवस्त्र परिधान केलेली शुक्ला ; नीलसरस्वती, महायोगिनी आहे; विद्या-ज्ञान-कला यांचे निधान असलेली ; निर्मळ, मालाधरी, सुकेशा आहे ; कमळाप्रमाणे डोळे असलेली , हिरा आणि मोराचे पीस यांनी सुशोभित चूडामणी धारण करणारी आहे ; ती शारदा मला मती आणि ज्ञानाचे मधुर अमृत प्रदान करो. ॥ ३ ॥

जिची सर्व ब्राह्मण , विद्वान, ज्ञानार्थी, विद्येचा आरंभ करणारे विद्यार्थी, तपस्वी तसेच योगी उपासना करतात; त्यांना वास्तविक, ईच्छित ( फळ ) प्रदान करणारी आणि ( ज्ञानाने ) उन्मत्त झालेल्याचे गर्वहरण करणारी आहे; ती शारदा मला मती आणि ज्ञानाचे मधुर अमृत प्रदान करो. ॥ ४ ॥

( प्रत्येक जीव जन्माला येताना जे कोशरूपाने सोबत घेवून येतो ते ) ज्ञान शाश्वत, उज्ज्वल असे समग्र गणपतीने निर्माण केलेले आहे ; परंतु (सरस्वती ) देवी गुरुमुखात स्थित होवून ते नित्य प्रकट करते ; जिच्या कृपाप्रसादाने जगात अज्ञानी आणि मूर्खही विद्वान होतो ; ती शारदा मला मती आणि ज्ञानाचे मधुर अमृत प्रदान करो. ॥ ५ ॥

हे ( गंगेसमान ) पवित्र, वाग्देवी, महादेवी सरस्वती ! ज्ञान दे, आशीर्वाद दे.
- डॉ . पुष्करराज उदय वर्तक, १५-११-२०१४.